**हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी तालुक्यातील योजनाबाह्य रस्त्याचा ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१६३/नियोजन-२**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक- ०४ डिसेंबर, २०१८.**

पहावे :-१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचे पत्र क्र.मुअऔ/का-१४/प्रआ/रवियो-०१-२१/४७२९ दि. २७/०९/२०१८.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी तालुक्यातील राष्ट्रीय महामार्ग-३६१ ते जामगव्हाण तांडा ते जामगव्हाण रस्ता या रस्त्याचा रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समावेश करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाला आहे.

सदर रस्ता या रस्त्यावरील गावे मुख्य मार्गास जोडण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. सदर रस्ता खडी रस्ता असून यासाठी भूसंपादनाची आवश्यकता नाही. तसेच सदर रस्ता रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्याबाबत जिल्हा परिषद, हिंगोली यांची मागणी आहे. त्यामुळे उपरोक्त रस्ता विकास योजना २००१-२१ मध्ये ग्रामीण मार्ग म्हणून समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, हिंगोली यांची मागणी विचारात घेऊन, हिंगोली जिल्ह्यातील कळमनुरी तालुक्यातील **राष्ट्रीय महामार्ग -३६१ ते जामगव्हाण तांडा ते जामगव्हाण रस्ता** कि.मी. ०/०० ते ३/६०० ( ३.६०० कि.मी.) हा रस्ता **ग्रामीण मार्ग क्र.१०३** म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहे.

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२१ मधील हिंगोली जिल्ह्यातील **ग्रामीण मार्ग** रस्त्यांच्या एकूण लांबीत **३.६०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (१९०५.४०० + ३.६००) म्हणजेच **१९०९.०० कि. मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०४१५१६५४७४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swaroop Tukaram Raipure

Digitally signed by Swaroop Tukaram Raipure
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2923930fb1a491b85ab7752c1dc4f2e3b8db33e2a8a322ed2dcfb496a3a97175, serialNumber=427875b948dcfc3f94a33993f9f923cb42f66fb0e5e2c213e8a174114e57cc46, cn=Swaroop Tukaram Raipure
Date: 2018.12.04 15:20:50 +05'30'

**(स्वरूप रायपुरे)**
उप अभियंता तथा कार्यासन अधिकारी,
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
२) उप सचिव,ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
४) अधिक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,नांदेड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
५) जिल्हाधिकारी, हिंगोली.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, हिंगोली.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, हिंगोली
८) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.